केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२ " (ISDSI) योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सपववि-४००१३/३/२०२४-DESKSERICULTURE-CMTD**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- २३ ऑगस्ट, २०२४

वाचा: - १) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक :- धोरण २०२३/प्र.क्र.११ /टेक्स-५, दि. ०२ जून, २०२३.

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक :- सपववि ४००१५/२/ २०२३/DESK SERICULTURE-CMTD, दि.०९ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शेतकऱ्यांना कृषि पिकाबरोबर हमखास व शाश्वत उत्पन्नाची हमी असलेल्या रेशीम शेती व त्यावर आधारीत पुरक व्यवसायास चालना देण्यासाठी एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८, दि.०२ जून, २०२३ अंतर्गत विविध प्रोत्साहने व उपाययोजना घोषित केल्या आहेत. त्याअनुषंगाने केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) ही योजना सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीत राज्यात राबविण्यास दि.०९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत असून तुती लागवड, संगोपनगृह बांधकाम, संगोपन साहित्य खरेदी, सिंचनाची सुविधा, विविध औषधांचा पुरवठा इत्यादीसाठी शेतकऱ्यांना मदत केली जात आहे. सदर योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनूसार अनुसूचित जमाती या प्रवर्गातील लाभार्थ्याकरिता केंद्र व राज्य हिस्साचे प्रमाण ६५:२५ असे राहील असे नमूद करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) योजनेंतर्गत अनुसूचित जमाती या प्रवर्गातील लाभार्थ्यांच्या केंद्र व राज्य हिस्सा करीता अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठी नविन लेखाशीर्ष उघडण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) योजनेंतर्गत **"अनुसूचित जमाती"** या प्रवर्गातील लाभार्थ्यांना केंद्र हिस्सा व त्यास पुरक राज्य हिस्सा याची

रक्कम अदा करण्यासाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| **केंद्र हिस्साकरीता लेखाशिर्ष** | | | |
|---|---|---|---|
| **मागणी क्र.टी-०५** | | **Demand No.T-05** | |
| २८५१ | ग्रामोद्योग व लघुद्योग | 2851 | Village and Small Industries |
| ०० | | 00 | |
| ७९६ | जनजाती क्षेत्र उपयोजना | 796 | Tribal Area Sub Plan |
| (०२) | जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना | (02) | Outside Tribal Area Sub Plan |
| (०२) (०२) | सिल्क समग्र-२ ISDSI (रेशीम उद्योगांच्या विकासासाठी एकात्मिक योजना) (केंद्रीय क्षेत्र योजना) (केंद्र हिस्सा ६५ %) (२८५१ ७५१६) | (02) (02) | Silk Samagra-2 ISDSI (Integrated Scheme for Development of Silk Industry) (Central Sector Scheme) (Central Share 65%) (2851 7516) |
| ३१ | सहायक अनुदाने (वेतनेतर) | 31 | Grant in aid ( Non salary**)** |

| **राज्य हिस्साकरीता लेखाशिर्ष** | | | |
|---|---|---|---|
| **मागणी क्र.टी-०५** | | **Demand No.T-05** | |
| २८५१ | ग्रामोद्योग व लघुद्योग | 2851 | Village and Small Industries |
| ०० | | 00 | |
| ७९६ | जनजाती क्षेत्र उपयोजना | 796 | Tribal Area Sub Plan |
| (०२) | जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना | (02) | Outside Tribal Area Sub Plan |
| (०२) (०३) | सिल्क समग्र-२ ISDSI (रेशीम उद्योगांच्या विकासासाठी एकात्मिक योजना) (केंद्रीय क्षेत्र योजना) (राज्य हिस्सा २५%) (२८५१ ७५२५) | (02) (03) | Silk Samagra-2 ISDSI (Integrated Scheme for Development of Silk Industry) (Central Sector Scheme) (State Share 25%) (28517525) |
| ३१ | सहायक अनुदाने (वेतनेतर) | 31 | Grant in aid ( Non salary) |

२. सदर शासन निर्णय हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.सं: ख.वि./चा-१ सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग /यूओआर-०६/२०२४-२५/१०३, दि.२९.०४.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१५, दि.०५.०६.२०२४ नुसार, वित्त विभागाच्या दि.०९.०८.२०२४ रोजीच्या टिप्पणीन्वये तसेच आदिवासी विकास विभागाच्या दि.१२.०८.२०२४ रोजीच्या टिप्पणीन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०२४०८२३१२०९५०८८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRADDHA DEVEN KOCHAREKAR

Digitally signed by SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC51883E2B27843640CD6C07C96E3E8715CC5BFBE554420E4D68E5F4B112388A, cn=SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
Date: 2024.08.23 12:24:43 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय विभाग) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधान भवन, मुंबई.
८) सर्व माननीय संसद सदस्य/ विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
९) मा.समितीप्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ रोहयो समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१०) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११) मा.सदस्य सचिव, केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरू.
१२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व विभागीय आयुक्त.
१७) आयुक्त, आदिवासी आयुक्तालय, नाशिक.
१८) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय,नागपूर.
१९) महालेखापाल, (महाराष्ट्र-१), लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, मुंबई.

२०) महालेखापाल, (महाराष्ट्र-२), लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा,नागपूर.

२१) उपसचिव (वस्त्रोद्योग), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

२४) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१४/(अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.

२५) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४११), मंत्रालय, मुंबई.

२६) कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६), मंत्रालय, मुंबई.

२७) कक्ष अधिकारी (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

२८) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालय.

२९) सर्व जिल्हा रेशीम कार्यालय.

३०) निवड नस्ती (रेशीम कक्ष)